# कोण तुजसम सांग

(kon tujsam saang)

लेखिका:- नंदिनी देशमुख

nandini.deshmukh@gmail.com

9004094617

प्रकाशक: ई-साहित्य प्रतिष्ठान

वेब: www.esahity.com

ईमेल esahity@gmail.com

प्रकाशन : २८ फ़ेब्रुवारी २०१५

ही एकांकिका…

“ज्यांच्या आशिर्वादाने माझे आयुष्य समृध्द झाले ते माझे परमपूज्य गुरुवर्य कै . रंगनाथ महाराज कंधारकर यांच्या चरणी”

आदरपुर्वक अर्पण

नंदिनी देशमुख

**एकांकिका**

# कोण तुजसम सांग...

**लेखिका:- नंदिनी देशमुख**

nandini.deshmukh @gmail.com





# तुमच्यासारख्या तुम्हीच

(पडदा उघडतो तेव्हा रंगमंचावर न्यायदेवतेने आयोजित केलेल्या खुल्या चर्चा सत्राचे दृष्य दिसते आहे. मध्यभागी एक खास आसन न्यायदेवतेसाठी ठेवलेले आहे . न्यायदेवतेच्या समोर असलेल्या मेजावर काही कागद, पेन, एक छोटासा फ्लावरपॉट आहे. त्या हॉलला साजेशी सजावट. त्या टेबलखुर्चीच्या दोन्ही बाजूला तीन तीन आसने चर्चासत्रासाठी येणाऱ्या लोकांसाठी ठेवलेली आहेत. त्यावर सहा स्त्रिया बसलेल्या आहेत. न्यायदेवतेची खुर्ची रिकामी आहे . त्या सहा खुर्च्यांवर बसलेल्या सहा स्त्रिया खालीलप्रमाणे

कुंती:- वय वर्षे साठ. केस थोडे पांढरे . पांढरी साडी, पांढरा ब्लाउज. गळयात मोत्याची माळ.

गांधारी:- राणीचा वेष . वय वर्षे साठच्या आसपास. डोळयाला पट्टी.

द्रौपदी:- वय वर्षे ४५. मोकळे केस. राणीचा वेष.

सीता:- वय वर्षे २५ ते ३०. वनवासात, ऋषीमुनींच्या आश्रमात

असतांना असतो तसा वेष. भगवी वस्त्रे, कानात कर्णफुले,

डोक्यावर फुलांच्या माळा.

अहिल्या:- अकाली पोक्तपणा आलेली . ऋषीपत्नीचा वेष . गळयात

रुद्राक्षांची माळ . अंगावर पांढरे भस्माचे पट्टे. सीता व

अहिल्या दोघींचा वेष सारखा असला तरी दोघींचे वेगळेपण

उठून दिसले पाहिजे.

मंदोदरी:- वय वर्षे चाळीस . राणीला साजेल असा वेष . भरजरी साडी

दागिने .

(पडदा हळूहळू वर जातो तसा रंगमंचावर उजेड पसरत जातो. पडदा पूर्णपणे वर गेल्यानंतर सर्वांचे चेहरे स्पष्ट दिसू लागतात . न्यायदेवतेच्या एका बाजूला सीता, अहिल्या आणि मंदोदरी बसल्या आहेत तर दुसऱ्या बाजूला कुंती, गांधारी आणि द्रौपदी बसल्या आहेत. पडदा पूर्ण वर गेल्यानंतर त्याचवेळी पडद्यामागून एक ध्वनी प्रक्षेपण केले जाते .

‘सावधान ...सावधान ... होशियार .. न्यायदेवतेचे आगमन होत आहे हो.. . न्यायदेवतेने खास स्त्रियांसाठी बोलावलेल्या या खुल्या चर्चा सत्रात सहभागी होण्यासाठी आलेल्या आपणा सर्वांचे स्वागत असो. सावधान, होशियार न्यायदेवतेचे आगमन होत आहे हो.... हे वाक्य संपता संपताच न्यायदेवतेचा रंगमंचावर प्रवेश होतो. तरुण, सुंदर, उंच स्त्री. डोळयांवर काळी पट्टी बांधलेली. न्यायदेवता आपल्या आसनावर स्थानापन्न होतात. सर्वजणी उठून उभ्या राहून त्यांना नमस्कार करतात. त्यांच्या बाजूलाच एका टेबलवर एक तराजू ठेवलेला आहे.)

न्यायदेवता:- नमस्कार . बरीच मंडळी जमलेली दिसत आहे. हे खुले चर्चासत्र मी खास स्त्रियांसाठी आयोजित केले आहे. मला असं समजलंय की आजच्या या खुल्या सत्रात जमलेली सर्व मंडळी खास आहेत म्हणून. तर प्रथम आपण सर्वांचा परिचय करून घेऊ. (आजूबाजूला इशारा करून आपण आपला परिचय द्यावा अशा अर्थाने हावभाव करते.)

कुंती:- मी कुंती पंडू पांडव. पंडू राजाची पत्नी आणि पाच पांडवांची माता.

गांधारी:- मी गांधारी धृतराष्ट्र कौरव. धृतराष्ट्रांची पत्नी. मी माझे सगळे आयुष्य डोळयाला पट्टी बांधून काढले आहे.

द्रौपदी:- मी द्रौपदी. युधिष्ठीर, भीम, अर्जून, नकुल आणि सहदेव पांडव या पाच पांडवांची पत्नी.

सीता:- मी सीता रामराव सूर्यवंशी. दशरथराव सूर्यवंशी यांचे चिरंजीव श्रीराम यांची मी एकमेव पत्नी.

अहिल्या:- मी अहिल्या गौतम ऋषी. गौतम ऋषींची पत्नी.

मंदोदरी:- मी मंदोदरी रावण लंकेश्वर. लंकापती रावण यांची पत्नी.

न्यायदेवता:- (आश्चर्याने) आपण सर्वजणी एवढ्या मोठ्या महान स्त्रिया आज या खुल्या चर्चासत्रात कशा काय आलात? आपले पाय माझ्या दाराला लागले हे माझे केवढे भाग्य! किती मी भाग्यवान. पण आपणा सर्वांचे इथे येण्याचे प्रयोजन काय?

(सर्वांची चुळबुळ चालू आहे)

न्यायदेवता:- आपण सर्वजणी इथे कशासाठी आला आहात मला कळेल का?

(सर्वजणी एकाच सुरात म्हणतात, 'आम्हाला न्याय हवा आहे'.. 'आम्हाला न्याय हवा आहे.)

न्यायदेवता:- न्याय? आणि तुम्हाला? का बरे? एवढ्या उत्तुंग व्यक्तिमत्वाच्या स्त्रिया तुम्ही. आणि आज असे काय झाले आहे की तुम्हाला आज अचानक माझ्याकडे न्याय मागण्यासाठी यावे लागले आहे?

अहिल्या:- हेच.. हेच. महान महान म्हणून सर्वांनी आमची मुस्कटदाबी करून ठेवली आहे.

द्रौपदी:- हे शल्य आम्ही आमच्या मनात किती दिवसांपासून जपून ठेवले आहे.

सीता:- होय. आम्ही ज्या प्रसंगामधून बाहेर पडलो त्याची आज आम्हाला दाद मागायची आहे.

न्यायदेवता:- ठिक आहे. तुम्ही इथे आला आहात तर तुमचे म्हणणे ऐकून घेणे हे माझे कर्तव्य आहे.

कुंती:- थांबा. आज आमची तक्रार ऐकून घेतांना किंवा निर्णय देतांना तुम्ही डोळयांवरची पट्टी काढून टाकायची. आम्हाला न्याय डोळसपणे मिळाला पाहिजे.

(सर्वजणी एक सुरात म्हणतात. ' हो पट्टी काढा. आधी डोळयांवरची पट्टी काढा.')

न्यायदेवता:- तुमचा सर्वांचा आग्रहच असेल तर मी डोळयांवरची पट्टी काढेन. पण माझी एक अट आहे.

(सर्वजणी 'काय?' अशा प्रश्नार्थक चेहऱ्याने त्यांच्याकडे बघतात.)

न्यायदेवता:- आज गांधारीने पण तिच्या डोळयांवरची पट्टी काढली पाहिजे.

द्रौपदी:- (घाबरून) पण त्यांच्याकडे पातीव्रत्त्याच तेज भरपूर आहे. त्यांनी डोळयांवरची पट्टी काढली तर आपण सर्वजणी त्यांच्या नजरेने भस्म होवून जावू.

न्यायदेवता:- इथे कोण पतिव्रता नाही? आपण सर्वजणी थोर आहात. आपलेही तेज काही कमी नाही. आपण सर्वचजणी पतिव्रता आहात.

गांधारी:- आणि हो...! ही पाच नवऱ्यांची द्रौपदी सुध्दा..

कुंती:- हो. द्रौपदी सुध्दा पतीव्रताच आहे. माझ्या तोंडून चुकून निघालेला शब्द तिने आणि माझ्या मुलांनी पाळला. आणि तिच्यातील पातिव्रत्याच्या तेजामुळेच ती सगळया संकटांतून बाहेर पडली. तुमच्या मुलांनी थोडे का अत्त्याचार केले तिच्यावर?

गांधारी:- आणि तिचे नवरे म्हणजे तुमची मुले त्यावेळी खाली माना घालून का बसले होते?

द्रौपदी:- (हे सगळे सहन न होवून दोन्ही हात कानावर ठेवून ती ओरडते. )

बस.. बस झाले हे सगळे. अजूनही ते सगळे आठवले की माझा संताप होतो. आणि आपण इथे आलो आहोत कशासाठी? काहीतरी वाद काढून भांडत काय

बसलात? मी त्या प्रसंगातून कशी निभावून गेले माझे मला माहित. कृष्ण जर माझ्या मदतीला आला नसता तर माझे काय झाले असते?

न्यायदेवता:- ऑर्डर ... ऑर्डर. सबुरीने घ्या. आणि प्रत्येकजण आपापले म्हणणे व्यवस्थित सांगा.

गांधारी:- (मधेच उठून) पण देवी..! माझ्या डोळयांवरची पट्टी?

अहिल्या:- हो काढा.. डोळयांवरची पट्टी काढा.

गांधारी:- खरंच. मी सुध्दा खूप उतावीळ झाले आहे हे सगळे जग पहायला. द्रौपदी खूप सुंदर आहे हे फक्त ऐकले. तिचा मुखचंद्रमा काही बघायला नाही मिळाला मला.

द्रौपदी:- सासूबाई, मी काढू का तुमच्या डोळयांवरची पट्टी?

कुंती:- (तिच्याकडे रागाने बघते) हो, मोठा पुळका आलाय आता सासूबाईंचा. थोड्या वेळापूर्वीच तर काय काय बोलत होती.

(द्रौपदी काही बोलणार तेवढ्यात सीता समोर येते.)

सीता:- असू द्या. मी काढते त्यांच्या डोळयांवरची पट्टी. नाहीतरी वाल्मिक ऋषींच्या आश्रमात राहून मला असल्या कामांची बरीच सवय झालेली आहे.

द्रौपदी:- मलासुद्धा आहे म्हटलं. सैरंध्री झाले होते तेव्हा तर दासींची कामं केली आहेत मी.

अहिल्या:- आमचा तर सगळा जन्मच गेला, आश्रमात कामं करता करता. सुख म्हणून कसं असतं ते बघायला सुध्दा मिळालं नाही.

गांधारी:- मग इंद्रासोबत गेली असतीस तर चांगली सुखात राहिली असतीस.

अहिल्या:- श्शी... काय बोलता? त्याने तर मला धोका दिलाय. आणि त्यासाठीच तर न्याय मागण्यासाठी मी इथे आले आहे.

न्यायदेवता:- ठिक आहे, तुम्ही असे आपसात असे वाद घालत नका बसू. कुणीतरी गांधारीच्या डोळयांवरची पट्टी काढा आधी.

(सीता, अहिल्या आणि द्रौपदी तिघीजणी मिळून गांधारीच्या जवळ येतात आणि तिच्या डोळयांवरची पट्टी काढतात. गांधारी हळूहळू डोळे उघडते. तिच्या चेहऱ्यावर खूप आनंद आहे.)

गांधारी:- अहाहा ... कित्ती छान. किती मोकळे वाटतेय म्हणून सांगू? (सर्वांकडे बघते) सीता, कुंती, मंदोदरी, अहिल्या आणि ही द्रौपदी?

द्रौपदी, किती सुंदर आहेस गं तू? (द्रौपदी लाजते. कुंतीला राग येतो)

कुंती:- पुरे झालं आता कौतुक. देवी, आता आपणही आपल्या डोळयांवरची पट्टी काढा आणि डोळसपणे जगाकडे बघा.

मंदोदरी:- जगाशी आपल्याला काय करायचे आहे? आमच्या तक्रारी ऐकून घ्या आणि आम्हाला न्याय द्या.

(सर्वजणी एकाच सुरात ओरडतात. ‘हो.. हो.. आम्हाला न्याय मिळालाच पाहिजे.)

न्यायदेवता:- ऑर्डर.. ऑर्डर. शांत व्हा. शांत व्हा. आपण सर्व इथे त्यासाठीच तर आलो आहोत. तुम्ही सर्वजणी एक एक करून आपले म्हणणे माझ्या समोर सादर करावे. मी नाव घेईन त्याप्रमाणे उठून आपली बाजू मांडावी. तर सर्वप्रथम कुंती. कुंतीदेवी पंडू पांडव.

कुंती:- (उठून उभी रहाते) मी कुंती. राजकन्या पृथा. माझ्या सर्व आयुष्याची हकीकत सांगत बसले तर वेळ पुरणार नाही, म्हणून थोडक्यात सांगते. मी राजकन्या असतांना दुर्वास मुनींची सेवा केली हा काय माझा गुन्हा झाला? तारुण्य सुलभ उत्सुकतेने लग्नाच्या आधी सूर्यदेवतेची आराधना केली हा काय अपराध झाला? मग दैवाने मला अशी कठोर शिक्षा का दिली? पोटच्या मुलाला अनाथ करावे लागले. ज्या पराक्रमी मुलाला एका कुणब्याच्या घरी आपले सर्व आयुष्य व्यतीत करावे लागले, जन्मभर कौरवांचे आश्रित म्हणून राहावे

लागले, त्याच्या पाठीवरून प्रेमाने हात फिरवण्याचे भाग्य सुध्दा मला लाभले नाही. त्याच्या तोंडून 'आई' ही हाक ऐकण्यासाठी मी जन्मभर तरसले. आजारी, रोगीष्ट अशा पांडू राजांशी माझे लग्न झाले. पण संसारसुख माझ्या आयुष्यात नव्हते. दुर्वास ऋषींच्या आशीर्वादाने मी तीन मुलांना जन्म दिला. पुढे मी माझे दोन वर माद्रीला दिले ज्यामुळे तिलाही दोन मुलांची आई होण्याचे भाग्य मिळाले. पुढे तर सगळया गोष्टींचा कहरच झाला. पांडू राजांचा मृत्यू, माद्रीचे सती जाणे, द्यूत, द्रौपदीची विटंबना, वनवास, युध्द... मला वीट, वीट आला होता संसाराचा . का अशी ही सगळी हेळसांड झाली माझ्या आयुष्याची? माझ्याकडून अशी कोणती चूक झाली होती की ही एवढी मोठी शिक्षा मला मिळाली? न्यायदेवते, आपल्याकडे काही उत्तर आहे का माझ्या या प्रश्नाचे?

न्यायदेवता:- कुंतीमाते, तुझी कहाणी मी ऐकली. तू खरंच श्रेष्ठ आहेस. पण तुझ्या या प्रश्नाचे मी आत्ताच काही उत्तर देणार नाही. आधी आपण सर्वांचे काय म्हणणे आहे ते ऐकून घेऊ. आता गांधारी, गांधारी धृतराष्ट्र कौरव आपले म्हणणे सादर करतील.

गांधारी:- (उठून उभी रहाते. आपल्याला हे सर्व बघायला मिळतंय याचा आनंद तिच्या चेहऱ्यावर आहे) अहाहा.. हे सगळे बघून कित्ती कित्ती छान वाटते आहे . (खिडकीतून बाहेर डोकावल्यासारखे करते) . ही सृष्टी , हे सौंदर्य माझ्या नशिबात आत्तापर्यंत का नव्हते हे सगळे? देवी, एका आंधळया नवऱ्याबरोबर मी आयुष्यभर डोळे बांधून संसार केला. दुर्योधन, दु:शासन सारख्या दुष्ट अशा शंभर पुत्रांना जन्म दिला, की ज्यांनी सगळा वंश नष्ट करून टाकला. एक यशस्वी स्त्री, एक यशस्वी माता होण्याचे भाग्य मला का लाभले नाही? असा काय अपराध केला मी? (खाली बसते)

(सगळेजण सुन्न बसून आहेत . कुणीच काही बोलत नाही)

न्यायदेवता:- गांधारी, खरेच तुझी कहाणी ऐकून मन सुन्न झाले आहे. डोळे असून तू सर्व आयुष्य अंधारात घालवलेस! पण आपण आधी पुढच्यांचे म्हणणे काय आहे ते तर ऐकून घेऊ. हं.. द्रौपदी....

(पुढे काय म्हणावे ह्या विचाराने बुचकळते. तेवढयात द्रौपदीच उठून उभी राहते)

द्रौपदी:- का..? थांबलात का? माझ्या पाचही नवऱ्यांची नावे माझ्या नावापुढे लावून माझ्या नावाचा पुकारा करा ना ..! नियतीला का असे माझ्या आयुष्याशी खेळावे वाटले? पाच नवरे, दहा सासवा.. न्यायदेवते, माझ्या आयुष्यातील एक एक घटना म्हणजे जुगार. आणि माझ्या नव-यांनी सुध्दा मला जुगारात पणाला लावलीच ना? तेव्हा माझ्या या सासूबाई, या सासूबाई (कुंती आणि गांधारीकडे निर्देश करते) का गप्प बसल्या? तो प्रसंग आठवला की अजूनही अंगावर शहारे येतात. भर दरबारात दु:शासनाने मला फरपटत नेली. माझ्या वस्त्राला हात घातला , त्यावेळी ... त्यावेळी.. (एकदम दोन्ही हातात तोंड लपवून स्फुन्दायला लागते. कुंती आणि गांधारी दोघी उठून तिच्याजवळ जातात.)

गांधारी:- द्रौपदी, खरंच मला समजत नाही की माझी मुले त्यावेळी अशी कशी वागली? मी डोळयांवर पट्टी तर बांधलीच होती पण पुत्रप्रेमाने पण मला आंधळे केले होते.

कुंती:- भीम, अर्जुन असे गप्प कसे काय बसले?

द्रौपदी:- भीम, अर्जुनच काय पण आणखी किती तरी वडील आणि मातब्बर मंडळी दरबारात मंडळी दरबारात होती, पण कुणीही हुं का चुं केले नाही. काय अपराध होता माझा? स्वयंवराच्या वेळेस मस्त्यवध करायला उठलेला शूर, वीर तेजस्वी कर्ण हा सुध्दा कुंतीपुत्रच होता ना? त्याच वेळेस मी त्याच्या गळयात वरमाला घातली असती तर? पण माझ्या नशिबात काही वेगळेच होते. कुंतीमातेने मोठ्या मनाने आशीर्वाद दिला. ‘जे काय आहे ते पाचहीजण

वाटून घ्या' ... आणि ते सर्व आज्ञाधारक पुत्र. पत्नी ही काय वस्तू आहे सर्वांमध्ये वाटून घ्यायला? त्यानंतर तो वनवास, तो अज्ञातवास, ते युध्द... माझ्या डोळयांसमोर झालेला माझ्या सगळया मुलांचा मृत्यू. का ही शिक्षा मिळाली मला?

(कुंती तिची समजूत घालण्यासाठी तिच्या जवळ जाते. )

कुंती:- शांत हो, .. द्रौपदी शांत हो. त्या सगळया गोष्टी घडून गेल्या आहेत. भूतकाळात जमा झाल्या आहेत. तू खूप धैर्याने सहन केलेस सगळे.

द्रौपदी:- हो. पण मी असा काय गुन्हा केला होता की हे सगळे भोग मला भोगावे लागले. त्यासाठीच तर मी इथे न्याय मागायला आले आहे.

(न्यायदेवते सहित सगळयाजणी क्षणभर स्तब्ध )

न्यायदेवता:- द्रौपदी, तुझी कथा ऐकून त्यावर बोलायला सध्या तरी माझ्याजवळ शब्द नाहीत. तोपर्यंत आपण पुढे जावू. सीता रामचंद्र सूर्यवंशी.

सीता:- ह्या सगळयांच्या कथेपेक्षा माझी कथा थोडी वेगळी आहे. माझे पती माझ्याशी एकनिष्ठ होते, एवढे की एकपत्नी राम म्हणून आजही त्यांची ओळख आहे. परंतु एवढे प्रेम करणारा नवरा असूनही माझ्या नशिबाचे भोग काही मला चुकले नाहीत. वनवास पत्करावा लागला, तो मी आनंदाने पत्करला, माझे पती माझ्या सोबत होते. पण खरे दु:ख तर पुढेच आहे. रावणाने मला पळवून नेली, माझ्या पतीने युध्द करून मला सोडवले. मला अग्निदिव्यातून जावे लागले. पण एवढे करूनही केवळ एका धोब्याच्या बोलण्यामुळे माझ्या पतीने माझा त्याग केला. एका राजाची कन्या, एका शूरवीर, सर्वश्रेष्ठ राजाची पत्नी पण मला वाल्मिक ऋषींच्या आश्रमात रहावे लागले. तिथे मी दोन मुलांना जन्म दिला पण त्यांचे वडील कोण हे सांगणे सुध्दा मला शक्य नव्हते. न्यायदेवते, मी असा काय गुन्हा केला होता की या सगळया संकटांना मला तोंड द्यावे लागले. शेवटी मुलगे आणि वडील समोरासमोर युद्धाल भिडले.

काय अवस्था झाली असेल माझ्या मनाची? धरणी मातेने मला पोटात घेतले म्हणून बरे, नाहीतर मला कुणाला तोंडही दाखवावेसे वाटत नव्हते.

न्यायदेवता:- अग्निपरीक्षा देवूनही पतीकडून त्याग होणे, ही खरोखरच भयंकर गोष्ट आहे. आपल्या सर्वांचे बोलणे ऐकून माझ्यासुध्दा हृदयात कालवा कालव होत आहे. पण आपण पुढच्यांचेही म्हणणे ऐकून घेऊ. अहिल्या गौतम आता आपले म्हणणे सादर करतील.

अहिल्या:- (उठून उभी रहाते.) न्यायदेवते, सीतेची कहाणी ऐकून माझ्या हृदयाचे पाणी पाणी होतेय. ज्या रामचंद्रानी माझा उध्दार केला, त्यांनीच सीतेसारख्या पवित्र स्त्रीला तिच्या हक्कांपासून वंचित केले. आयुष्यभर वनवास भोगावा लागला. राम रावण युद्धानंतर चांगले सुखाचे दिवस आले होते, तर .. तर पुन्हा वनवास तिच्या नशिबाला आला आणि तोही एकटीने...

सीता:- अहिल्यादेवी, आपण आपले म्हणणे सादर करावे. माझे काय..? माझे सगळे आयुष्य म्हणजे एक धगधगता वणवाच...

अहिल्या:- मी म्हणते, का हे स्त्रियांच्या आयुष्याचे असे धिंडवडे निघावेत? आपण सर्वजणी पतिव्रता होतो. आपला धर्म आपण निभावला, प्रामाणिकपणाने आपल्या पतीची सेवा केली. पण माझ्या आयुष्यात? माझ्या आयुष्यात काही वेगळेच घडले. त्या इंद्राची वाईट नजर माझ्यावर पडली. त्याने माझ्या पतीचे रूप घेवून मला फसवले आणि माझ्या पतीने शाप देवून मला आयुष्यभर शिळा करून टाकली. शिळा म्हणजे काय तर दगड . अक्षरशः दगड म्हणूनच मी माझे सर्व जीवन व्यतीत केले. श्री रामचंद्रांनी माझा उध्दार केला नसता तर? तर कल्पनाही करवत नाही. इंद्राने मला फसवले त्यात माझा काय दोष होता, की ज्यामुळे मला शिळा म्हणून जीवन कंठावे लागले. (एक उसासा टाकते आणि खाली बसते.)

न्यायदेवता:- आता शेवटी राणी मंदोदरी रावण लंकेश्वर आपले म्हणणे सादर करतील.

मंदोदरी:- (उठून उभी रहाते पण खूपच कावरी बावरी झाली आहे.) देवी, या सगळयांच्या व्यथा ऐकून मला खूपच कसेसे होत आहे. ह्या सर्वांच्या तुलनेत माझ्या दु:खाची जागा कुठे आहे तेच समजत नाही. माझे दु:ख तर दूरच राहिले पण सीतेच्या दु:खाला माझे पती कारणीभूत असल्यामुळे तर मलाच अपराधी असल्यासारखे वाटत आहे. पण न्यायदेवते, माझे एकच म्हणणे आहे, एवढे शिवभक्त, एवढे ऐश्वर्यमान असलेले माझे पती आणि त्यांना ही अशी सीतेला पळवून आणण्याची दुर्बुद्धी का व्हावी? माझ्यात असं काय कमी होतं म्हणून त्यांचं लक्ष सीतेवर गेलं? नवऱ्यांनी कसेही वागावे, कसेही असावे आणि बायकांनी मात्र ते सगळे मुक्तपणे सोसावे, हे बायकांच्याच नशिबात का? माझ्या पतीच्या कर्माची शिक्षा त्यांना मिळाली, श्रीरामांच्या हातून त्यांचा वध झाला, पण मी मात्र विधवा झाले. पुत्र गमावला. काय गुन्हा होता माझा? दुसऱ्यांच्या तुलनेत माझं दु:ख कमी वाटत असले तरी शेवटी दु:ख ते दु:खच. आणि ते मी अनुभवलेय. (खाली बसते)

(क्षणभर स्तब्धता. ह्या सर्वांच्या कथा ऐकून न्यायदेवता सुध्दा थोडी विचारात पडली आहे. )

न्यायदेवता:- खरंच, तुम्हा सर्वांच्या व्यथा, अनुभव, दु:ख ऐकून मी खरोखरच हतबुध्द झाले आहे. तुमचा तक्रारीचा सूर बरोबर आहे कारण ते सर्व तुम्ही स्वतः भोगलंय, अनुभवलंय. आता तुम्हाला न्याय द्यायचा, म्हणजे नेमकं काय करायचं ते मलाही सुचत नाही. कारण न्याय हा एकतर्फी देता येत नाही. दुसरी बाजू ऐकून घेणेही तेवढेच आवश्यक असते. तेव्हा....

(तेवढ्यात नारदाचा प्रवेश. नारायण ...नारायण... चिपळया वाजवितच नारदमुनी प्रवेश करतात.)

न्यायदेवता:- मुनीवर आपण? (उठून उभी रहाते. सर्वजणी उठून उभ्या राहतात आणि नारदमुनींना नमस्कार करतात.)

कुंती:- आपण इथे कसे आचार्य?

नारद:- मला ही खुल्या चर्चासत्राची बातमी समजली तेव्हाच अंदाज आला होता की तुम्ही सर्वजणी इथे भेटणार म्हणून.

गांधारी:- मग आमचे काही चुकले का? आमच्यावर जे अन्याय झाले त्याची दाद मागायला आम्ही इथे आलो आहोत.

नारद:- (न्यायदेवतेकडे बघून) मग? मिळाला का तुम्हाला न्याय?

न्यायदेवता:- मी फक्त एकच बाजू ऐकून घेतली आहे मुनीवर! दुसरी बाजू.....

नारद:- तुम्ही न्याय देवूच शकणार नाही देवी... काय न्याय देणार या साध्वींना? आणि आता त्याचा उपयोग तरी काय?

अहिल्या:- म्हणजे आमच्या इथे येण्याचा काहीच उपयोग नाही?

मंदोदरी:- आम्हाला आताच्या नवीन युगाप्रमाणे चांगलं आयुष्य जगायचंय.

नारद:- चांगलं म्हणजे कसं?

सीता:- चांगलं म्हणजे सुखी, स्वच्छंदी, किती आनंद , किती सुखसोयी...

कुंती:- नाहीतर काय? किती स्वातंत्र्य आहे आजकाल बायकांना!

नारद:- (छद्मीपणे हसतो आणि प्रेक्षकांकडे बघून म्हणतो) हं... आजकालच्या बायका सुखी, आनंदी, स्वतंत्र...

न्यायदेवता:- कुणी सांगितले तुम्हाला आजकालच्या बायका सुखी आहेत म्हणून?

गांधारी:- ते दिसतंय की आम्हाला..!

द्रौपदी:- पण तुम्ही तर डोळ्यांवर पट्टी बांधली होती ना.. मग..?

गांधारी:- दिसतं म्हणजे कळत गं सगळं .

मंदोदरी:- पण आम्हाला दिसतं ना..

नारद:- दिसतं तसं नसतं देवी.. दिसतं तसं नसतं म्हणूनच जग फसतं. नाही विश्वास बसत ना माझ्या बोलण्यावर? ठिक आहे तर मग. न्यायदेवतेचे काय मत आहे ते विचारू. (न्यायदेवतेकडे पाहून), देवी, दुसरी बाजू तुमच्यासमोर नाही हे मान्य आहे. पण आत्तापर्यंत त्यांनी जे काही सांगितले त्याप्रमाणे तुम्ही टिपणे काढली आहेत. त्यांच्या सर्वांच्या म्हणण्याप्रमाणे त्यांच्यावर अन्याय झाला आहे. त्यांना आजकालच्या स्त्रियांप्रमाणे सुखी, आनंदी जीवन जगायचे आहे. ह्यावर आपले मत तर सांगू शकाल ना देवी?

न्यायदेवता:- मी माझे मत जरूर सांगेन. पण कदाचित त्यासाठी मला आपली थोडीशी मदत लागेल मुनीवर...

नारद:- अवश्य... नारायण... नारायण...

न्यायदेवता:- ठिक आहे तर मग. प्रथम यांनी त्यांचे जे काही म्हणणे सादर केले त्यावर मी थोडा विचार केला. या ठिकाणी जमलेल्या या स्त्रिया या दोन कालखंडातील आहेत. एक महाभारत आणि दुसरे रामायण. मला असे वाटते की, कुंती आणि गांधारी यांच्या वाट्याला जे आयुष्य आले ते त्यांचे प्राक्तन आहे. त्यांनी आयुष्यात जे निर्णय घेतले ते सर्वस्वी त्यांचे स्वतःचे आहेत. दुसऱ्याने कुणी त्यांच्यावर अन्याय केला नाही. नियतीने त्यांच्या कपाळी जे लिहिले ते त्यांनी भोगले. कुंतीने तिच्या बाळाला नदीत सोडणे आणि गांधारीने आपल्या डोळयांवर पट्टी बांधणे हे निर्णय त्यांचे स्वतःचे आहेत. त्यांच्यावर कुणी जबरदस्ती केली नाही. दुसरे म्हणजे त्यांना मिळालेले पती. ते तुमचे नशीब. विधात्याने स्वर्गात ज्या गाठी बांधलेल्या असतात त्याला मी काय करणार? पण कुंतीमाते, एवढे शूरवीर, तेजस्वी असे सहा पुत्र तुझ्या पोटी जन्माला आले हे तुझे केवढे भाग्य!

नारद:- हे झालं कुंती आणि गांधारीबद्दल. द्रौपदीचे काय?

न्यायदेवता:- द्रौपदीवर अन्याय झाला आहे आणि तो कौरवांनी केलाय. तिला भरसभेत फरपटत नेली...

नारद:- एक क्षण.. एक क्षण, देवी मी काही बोलू का?

(न्यायदेवता त्यांच्याकडे बघून स्मित करते.)

नारद:- द्रौपदी, तुला वाटते ना की आजकालच्या स्त्रिया सुखी आहेत म्हणून? पण आज तुझ्यासारखी विटंबना कित्त्येक स्त्रियांच्या वाट्याला आली आहे. त्यांचा बाजार मांडला जातोय. पण प्रत्त्येकीच्या मदतीला तुझ्यासारखा कृष्ण धावून नाही येत गं द्रौपदी! आज स्त्रियांवर होणारे अत्त्याचार, बलात्कार पाहिलेस तर तू मूर्च्छित होवून पडशील गं द्रौपदी.

('काय?' असे सर्वजणी एकदमच म्हणतात आणि एकमेकींकडे बघून आश्चर्य व्यक्त करतात.)

नारद:- (न्यायदेवतेकडे बघून) हं.. बोला, बोला तुम्ही पुढे.

न्यायदेवता:- रामायणामध्ये सीता, मंदोदरी यांच्यावर अन्याय झाला आहे. अहिल्या रामायणामध्ये शापमुक्त झाली, तिच्यावरही खरोखर अन्याय झाला आहे. पण....

नारद:- हो... पण दुसरी बाजू आपल्याकडे नाही ना..! त्यामुळे आपण काय बोलणार? पण मी बोलतो. मी सांगतो.. यांनी यांच्या आयुष्यात जे काही सहन केले त्याला तोड नाही. म्हणूनच आज या स्त्रिया सर्वांचे आदर्श आहेत. प्रात:काळी उठून अहिल्या, द्रौपदी ,सीता , मंदोदरी यांचे कुणी नुसते नामस्मरण केले ना तरी त्याची सगळी पापे धुवून निघतात.

मंदोदरी:- काय?

सीता:- आम्हाला हे माहित नाही.

नारद:- होय, देवीनो, तुम्ही किती श्रेष्ठ आहात हे तुम्हाला कसे माहित असणार?

अहिल्या:- आम्हाला श्रेष्ठ म्हणून आमची तोंडं गप्प करू नका नारदमुनी..!

सीता:- आम्हाला हे आत्ताचे सुखी आयुष्य जगायचे आहे.

नारद:- सध्याचे आयुष्य आणि सुखी? देवीनो, आजकालच्या स्त्रिया जे आयुष्य जगतात त्याला तुम्ही सुखी आणि आनंदी म्हणता? तुम्ही सर्वजणी फक्त एकदा खाली भूतलावर जावून बघा. त्यांच्यासारखी तारेवरची कसरत तुम्हाला जमणार नाही देवीनो...

कुंती:- तारेवरची कसरत? म्हणजे करतात तरी काय त्या?

नारद:- गाडा रेटतात. त्यांच्या प्रपंचाचा. त्यांच्या संसाराचा. आजची स्त्री ही सकाळी उठल्यापासून तो रात्री झोपेपर्यंत एखाद्या घाण्याच्या बैलाला जुंपल्याप्रमाणे सतत कामे करीत असते. घर सांभाळून नोकरी करते.

गांधारी:- नोकरी? नोकरी म्हणजे काय?

मंदोदरी:- आम्हाला समजेल असे थोडे स्पष्ट बोला ना मुनीवर..

नारद:- नोकरी म्हणजे चाकरी. दुसऱ्याची. आपले घरदार, मुलेबाळे सगळे सोडायचे आणि घराबाहेर पडायचे.

सीता:- म्हणजे स्त्रिया घराबाहेर पडतात? ती नोकरी कशासाठी करायची पण?

नारद:- कशासाठी? पोटासाठी.

द्रौपदी:- तुम्ही काय बोलताय ते आम्हाला काहीही काळात नाहीये मुनीवर.

नारद:- नाहीच समजणार. कुंती, द्रौपदी, सीता तुम्ही वनवास भोगला असेल पण मुंबईच्या लोकलमध्ये प्रवास करून नोकरी करणे तुम्हाला कालत्रयी शक्य नाही देवीनो. तुम्हाला ते जमणार नाही. अगं, द्रौपदी, या स्त्रिया जेव्हा बाहेर पडतात ना तेव्हा किती लोकांच्या अधाशी नजरांचा त्यांना सामना करावा लागतो, काय काय परिस्थितीला तोंड द्यावे लागते, तुम्ही कल्पनाच करू शकणार नाही.

कुंती:- म्हणजे सगळ्या स्त्रिया अशा बाहेर जातात, घरी कुणीच नसतं?

नारद:- असतात ना. काही जणी घरी बसून आपले गृहिणीपद निभावण्याचा प्रयत्न करतात. पण त्यांच्या यातना आणखी वेगळयाच . सगळं आयुष्य दुसऱ्यांसाठी घालवायचं, स्वतःच आयुष्य विसरायचं आणि परत वर अवहेलना, अपमान...

अहिल्या:- खरे नाही वाटत.

नारद:- खरे नाही वाटत ना? पण ते सत्त्य आहे. खोटे वाटत असेल तर न्यायदेवतेला विचारा. मी एकटा एवढे बोलतोय पण तेव्हापासून त्या गप्प आहेत. त्यांना सर्व काही माहित आहे. जे काही अन्याय, अत्त्याचार चालू आहेत त्याच्यापैकी एक कणभर अंश फक्त त्यांच्याकडे न्यायालयात दाखल होण्यासाठी येतात. बाकी असेच, मन मारून जगणारे, सहन करणारे..

न्यायदेवता:- खरे आहे हे सगळे. आजची स्त्री शिकली, सुधारली, पुढे जाण्याचा प्रयत्न करतेय. आयुष्यात सुख, आनंद मिळवण्याचा प्रयत्न करतेय पण त्यासाठी तिला कितीतरी संकटांचा सामना करावा लागतो. एखादीच इंदिरा गांधी, एखादीच किरण बेदी आणि एखादीच कल्पना चावला...

सीता:- आपण ही कुणाची नावे घेत आहात?

न्यायदेवता:- ह्या सर्वांनी आपल्या देशाची मान उंचावली, शान राखली. तुमच्यासारखीच. आज भारतीय संस्कृतीमध्ये तुम्हा सर्वाना तोड नाही. देवीनो तुम्ही सर्वजणी श्रेष्ठ आहात.

नारद:- देवीनो, तुम्ही जी संकटं भोगली, ज्या संकटांना तोंड दिले त्या सर्वांमधून आजच्या स्त्रीलाही जावे लागत आहे.

न्यायदेवता:- कुंतीमाते, तुझ्याप्रमाणे कितीतरी कुमारी माता ह्याही युगात आहेत. फसवल्या गेलेल्या, जबरदस्ती केल्या गेलेल्या पण .. पण प्रत्त्येकीच्या पोटी तुझ्यासारखा कर्ण जन्म घेत नाही गं...

नारदः- द्रौपदी, तुझ्यासारखे अत्त्याचार कितीतरी स्त्रियांवर होतात पण त्यांची लाज राखण्यासाठी कुणीही कृष्ण धावून येत नाही, कुणाचं रक्त उसळून येत नाही आणि युद्धही होत नाही.

न्यायदेवता:-सीता देवी, प्रभू रामचंद्रांनी तुमचा त्याग केला तशाच आज कितीतरी स्त्रिया परीत्त्यक्ता आहेत. कष्टाचे जीवन जगत आहेत. पण त्यांचे पती त्यांच्याशी एकनिष्ठ नसतात. तसे प्रेम त्यांच्या वाट्याला येत नाही उलट जन्मभर मनस्ताप सहन करावा लागतो.

नारदः- अहिल्यादेवी, तुमच्यासारख्या नकळत फसणाऱ्या कितीतरी स्त्रिया आजच्या युगातही आहेत. पण तुझ्यासारखा त्यांचा उध्दार करणारा श्रीराम अजून जन्माला आलेला नाही.

न्यायदेवता:- मंदोदरी देवी, रावणाने सीतेला पळवून आणले, वनात ठेवले पण तो तिला कधीही स्पर्श करू शकला नाही. हे सर्व सामर्थ्य तुम्हा दोघीच्या पातीव्रत्याचे. पण आजकाल कितीतरी विवाहित जोडपी विवाहबाह्य संबंध ठेवून असतात. त्यातल्या त्यात पुरुष जास्त. कितीतरी पुरुषांचे बाहेर इतर स्त्रियांशी संबंध असतात. अशा गोष्टी न्यायालयात येतात आणि त्यांचे संसार चव्हाट्यावर येतात.

नारदः- आणि गांधारीदेवी, तुम्हाला असे वाटतेय ना की तुमच्या पुत्रांनी निर्वंश केला म्हणून? तुम्ही डोळयांवर पट्टी बांधली होती तेच चांगले होते. तुम्हाला एक अभिमान बाळगला पाहिजे की तुमचे पुत्र शूरवीर होते. पण देवी, आज कितीतरी आयांच्या डोळयासमोर त्यांची मुलं वाया जात आहेत. डोळे उघडे असून सुध्दा त्या काही करू शकत नाहीत. (हे सर्व बोलत असतांना नारद व्यथित होतात.)

न्यायदेवता:- आम्ही हे सगळे पहात आहोत, रोज. न्यायदेवतेच्या डोळयात धूळ फेकायला सुध्दा लोक कमी करत नाहीत. म्हणूनच मी डोळयांवर पट्टी बांधली आहे. ह्या कलियुगाचे वारेच वेगळे आहे. इथे सुख तुमच्या मानण्यावर अवलंबून आहे. ज्या परिस्थितीत आहात त्या परिस्थितीत समाधानाने राहिले तर सुख मिळण्याची शक्यता आहे. पण ते फार अवघड आहे.

कुंती:- खरंच, आपणच ह्या स्त्रियांना वंदन करायला पाहिजे. किती हिरीरीने त्या लढत आहेत.

गांधारी:- परिस्थितीशी सामना करत आहेत.

मंदोदरी:- पुढे जाण्याचा प्रयत्न करत आहेत.

सीता:- आपले अस्तित्व शोधण्याचा प्रयत्न करत आहेत.

अहिल्या:- स्वतःच्या सुखाचा त्याग करून दुसऱ्यांना सुखी करण्याचा प्रयत्न करत आहेत.

कुंती:- न्यायदेवते, आज तुम्ही आणि नारदमुनींनी मिळून आमचे डोळे उघडले, आम्हाला सत्त्य परिस्थितीची जाणीव करून दिली.

न्यायदेवता:- देवीनो, प्रत्येकजण आपल्या जागी श्रेष्ठ आहे. तुम्ही तुमच्या जागी आणि त्या त्यांच्या जागी.

द्रौपदी:- खरंच, किती श्रेष्ठ आहेत ह्या स्त्रिया.

(असे सर्व बोलत असतानाच सर्वजणी एकमेकींचे हात हातात घेवून साखळी तयार करतात आणि हात वर करतात.)

नारद:- मग आपण त्यांना काय म्हणायला हवे?

सर्वजणी:- (एकाच सुरात) होय देवीनो, तुमच्यासारख्या तुम्हीच. तुमच्यासारख्या तुम्हीच.

(पडदा पडतो)

(समाप्त)

**************************************************************

एकांकिका

# कोण तुजसम सांग...

लेखिका:- नंदिनी देशमुख

nandini.deshmukh @gmail.com





# नंदिनी देशमुख



नंदिनी देशमुख यांना ई साहित्यचे वाचक “हा छंद जिवाला” व “आज अचानक” आदि लोकप्रिय एकांकिकांच्या लेखिका म्हणून ओळखतात. मूळच्या त्या नांदेडच्या. त्यांना लहानपणापासूनच लेखनाची आणि वाचनाची आवड होती. मग १९७७-७८ पासून त्यांनी लेखनास प्रारंभ केला. गेल्या पस्तीस वर्षांत अनेक मासिकांमधून त्यांच्या कथा प्रसिद्ध झाल्या आहेत. औरंगाबाद आकाशवाणी केंद्रावरून त्यांचे नभोनाट्य आणि ऐतिहासिक लेखन प्रसारित करण्यात आले. कथाश्री, आवाज, स्नेहप्रभा इ. दिवाळी अंकामधून त्यांच्या कथा प्रसिद्ध झाल्या. सकाळ कथा विशेषांक २००९ मध्ये त्यांच्या ‘प्रमोशन’ या कथेला प्रथम पारितोषक मिळाले. लोकसत्ता, सकाळ मधून त्यांनी विविध प्रकारचे लेखन केले. दैनिक प्रजावाणी नांदेड, दैनिक उद्याचा मराठवाडा, नांदेड या वर्तमानपत्रामधून त्यांनी सदर लेखन केले.

महाराष्ट्र राज्य नाट्य परिषद नांदेड शाखेतर्फे ‘अनुवंश’ आणि ‘मी रचना देसाई’ या त्यांच्या नाटकांचे प्रयोग करण्यात आले. कामगार कल्याण मंडळ स्पर्धेत ‘तुमच्यासारख्या तुम्हीच’ या त्यांनी लिहीलेल्या एकांकिकेला प्रथम पारितोषक मिळाले. २००४ मध्ये ‘औट घटकेची राणी ’ ही कादंबरी आणि २०१० मध्ये निरनिराळया मासिकांमधून प्रसिद्ध झालेल्या कथांचा ‘कुंपणाच्या पलीकडे’ हा कथा संग्रह प्रकाशित झाला.

हे सर्व लेखन करत असतानाच त्या नोकरीदेखिल करत होत्या. भारत संचार निगम लिमिटेड, मुंबई येथून लेखाधिकारी या पदावरून निवृत्त झाल्या.

ई साहित्य प्रतिष्ठानच्या वाचकांसाठी त्यांनी “हा छंद जिवाला…” आणि “आज अचानक…” या एकांकिका विनामुल्य दिल्याबद्दल वाचकांच्या वतीने आम्ही त्यांचे आभार मानतो.

हे पुस्तक कसं वाटलं ते नक्की कळवा.

टीम ई साहित्य

# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान ही काही व्यावसायिक प्रकाशन संस्था नाही. काही सामाजिक ध्येय डोळ्यांसमोर ठेवून मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांच्यासाठी ही तरुणांची संस्था काम करते आहे. सध्या ई साहित्य प्रतिष्ठानचे सव्वा दोन लाख वाचक आहेत.

ई साहित्य प्रतिष्ठानच्या पुस्तक खजिन्यात सातत्याने नवनवीन भर पडत असते. २०१४ मध्ये सुमारे शंभर ई पुस्तके आम्ही प्रकाशित केली. नवीन खूप सारी पुस्तकं लवकरच येत आहेत. एकाहून एक भारी. ही सर्व पुस्तकं सर्वच्यासर्व सव्वा दोन लाख वाचकांना देण्याचा आटोकाट प्रयत्न केला जातो. पण प्रत्येक वेळी ते जमतेच असे नाही. अनेक वाचकांपर्यंत काही पुस्तके पोहोचत नाहीत. पण VIP सदस्यांना मात्र सर्व पुस्तके नक्की दिली जातात. तुम्हाला सर्वच्या सर्व पुस्तके हवी असतील तर VIP सभासद बना.

VIP सभासद बनणं अगदी सोप्पं आहे. आपल्या ओळखीच्या दहा लोकांचे मेल आय डी कळवा आणि बना VIP सभासद.

एका दमात तीन कामं.

1. पहिलं म्हणजे तुम्ही VIP सभासद बनता. तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानचं पुस्तक ई मेलवर सर्वात आधी मिळतं. त्यांच्या प्रत्येक कार्यक्रमाचं आमंत्रण मिळतं. त्यांच्या भावी योजनांची माहिती मिळते. त्यांच्या कामात स्वतः सहभागी होण्याची संधी मिळते.

2. ज्या दहा किंवा अधिक मित्रांना तुमच्यामुळे फ्री पुस्तकं मिळतात ते खुश होतात. त्यांना त्यांच्या आवडीची पुस्तकं मिळाली की ते इतर लोकांना तुमच्याबद्दल सांगतात. त्यांच्यासाठी तुम्ही म्हणजेच ई साहित्यचे प्रतिनिधी बनता.

3. आणि यातून तुम्ही मराठी भाषेच्या संवर्धनाला अमूल्य असा हातभार लावता. आमचा उद्देश आहे मराठीतल्या सहा कोटी साक्षरांना वाचक बनवणं. आणि हे लक्ष्य साध्य करणं हे केवळ आणि केवळ मराठी लोकांना त्यांच्या भाषेवर असलेल्या प्रेमातूनच शक्य आहे. आपल्या भाषेचं राज्य व्हावं म्हणून १०६ हुतात्मे झाले. आपल्या भाषेनं राजा व्हावं म्हणून आपण एक दहा-वीस ई मेल आयडी देणारच ना! वाचनाची आवड असो वा नसो. फ़क्त मराठी साक्षर अशा दहा लोकांचे ई मेल पत्ते पाठवा. त्यांना वाचनाची आवड आपोआप लागेल. आपणच लावू. लावूच लावू. करूनच दाखवू.

आहे ना : एक दम : तीन काम.

संपर्क साधा : esahity@gmail.com

ही सेवा पूर्णपणे निःशुल्क आहे. त्यामुळे आपले मित्र आपल्यावर खुश होतील. शिवाय आम्ही ही खात्री देतो की या ई मेल्सचा वापर फ़क्त आणि फ़क्त मराठी साहित्य पाठवण्यासाठीच केला जाईल. इतर कसल्याही जाहिराती पाठवून त्यांना त्रास दिला जाणार नाही. तेव्हा लवकरात लवकर आपल्या माहितीतल्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला द्या.

www.esahity.com या वेबसाईटला भेट द्या.

आपल्या पत्राची वाट पहात आहोत.

धन्यवाद

आपले नम्र

टीम ई साहित्य प्रतिष्ठान